**जायकवाडी प्रकल्पातील पैठण उजवा कालवा तसेच माजलगाव प्रकल्पातील उजवा कालवा या बिगर लाक्षेवि प्रकल्पातील कालव्याच्या लाभक्षेत्रातील चर योजनाना प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
शासन निर्णय क्र सीडीए १०१०/(२८६/२०१०)/लाक्षेवि (कामे)
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक — २१ ऑक्टोबर,२०११

**प्रस्तावना**:-

पाटबंधारे प्रकल्पांच्या लाभक्षेत्रातील पाणथळ व क्षारमय जमिनी लागवड योग्य करण्यासाठी चर योजनेची बांधकामे पाटबंधारे संशोधन विभाग, पुणे मार्फत १९९६ पासून केली जातात. तसेच केंद्र शासन पुरस्कृत पुर्नरचित लाभक्षेत्र विकास व जलव्यवस्थापन कार्यक्रमातून देखील चर योजनेची कामे केली जातात. चर योजनेचे आर्थिक मापदंड शासन निर्णय क्र.डीआरएस १०९१/(२०४/९१)/सिंव्य (कामे) दिनांक २४/७/१९९७ अन्वये सुधारित करण्यात आले आहेत.

अधिक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय, पुणे यांचेकडून लाभक्षेत्र विकास कार्यक्रमा बाहेरील पैठण उजवा कालवा व माजलगाव उजवा कालवा या प्रकल्पातील कालव्याच्या लाभक्षेत्रातील खराबा क्षेत्र लागवडी योग्य करण्यासाठी चर योजनांचा प्राप्त झालेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

पैठण उजवा कालवा व माजलगाव उजवा कालवा या बिगर लाक्षेवि प्रकल्पातील कालव्याच्या लाभक्षेत्रातील खालील चर योजनांच्या बांधकामाच्या अंदाजित खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | प्रकल्पाचे/कालव्याचे नांव | चर योजनेचे नांव | चर योजनेचे क्षेत्र (हेक्टर) | अंदाजित खर्च (रु.लक्ष) |
|---|---|---|---|---|
| १ | पैठण उजव्या कालवा | सुर्डी | १८०.३५ | २०.०७ |
| २ | माजलगाव उजवा कालवा | लोणगांव | १०७.७९ | १५.५७ |
| ३ | माजलगाव उजवा कालवा | लोणगांव क्र.१ | १५४.४४ | १.८० |
| ४ | माजलगाव उजवा कालवा | रोषणपुरी | १८६.४० | १०.५९ |
| | | एकूण | ६२८.९८ | ४८.०३ |

लाभधारक शेतकरी चर योजनेसाठी विना मोबदला जमीन उपलब्ध करुन देतील व चर योजनेच्या क्षेत्रात पाणी वापर संस्था स्थापन करुन सदर चर योजनांच्या देखभाल व दुरुस्तीची

जबाबदारी पाणी वापर संस्थेवर सोपविण्यात येईल या अटीच्या अधीन राहून ही प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

सदरहू कामावर होणारा खर्च मागणी क्र. आय ५, ४७११ पूरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च (०२) जलनिस्सारण कामे (०२)(०३) जलनिस्सारण प्रकल्प ४७११२७९४ या लेखाशिर्षाखाली उपलब्ध निधीतून करण्यात यावा. तसेच या चर योजनेकरिता आर्थिक तरतुद उपलब्ध असल्याशिवाय सदर योजनांवर कोणताही खर्च करु नये. या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता लाक्षेवि (कामे) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये सन २०११-१२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर (WWW maharashtra gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११०२११६२८०६००१ असा आहे. हा शासन निर्णय आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( सं. अ. टाटू )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रति,

स्वीय सहाय्यक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोम वगळून)
लाभक्षेत्र विकास, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
स्वीय सहाय्यक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोम) मुंबई-३२
स्वीय सहाय्यक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई-३२
स्वीय सहाय्यक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मुख्य अभियंता (पा) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
अधिक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन विभाग, पुणे
उप सचिव (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अवर सचिव / लाक्षेवि (कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-३२
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई-३२
लाक्षेवि (कामे) संग्रहार्थ